**उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळाच्या अधिपत्याखालील ट्रामा केअर युनिट, जिंतुर, जि.परभणी येथील १२ अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१७/प्र.क्र.६४/आरोग्य-४**
१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीख: १९ एप्रिल, २०१७.

वाचा

१) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०१६/प्र.क्र.३८/आरोग्य-४, दि.२०.१०.२०१६.**
२) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७.**
३) **सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र, क्र.संआसे/कक्ष-३/टे-५/ट्राकेयुजिंतूर/अपदे-१२/सन२०१७-१८/३८२४-२५/१७, दि.१३.०४.२०१७.**

**शासन निर्णय**

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळाच्या अधिनस्त ट्रामा केअर युनिट, जिंतुर, जि.परभणी येथील १२ अस्थाई पदांना संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये दि.१.१०.२०१६ ते दि.२८.०२.२०१७ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळाच्या अधिनस्त ट्रामा केअर युनिट, जिंतुर, जि.परभणी येथील १२ अस्थाई पदांना दि.१.०३.२०१७ ते दि.३०.०९.२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर पदांवरील खर्च सन २०१७-१८ या आर्थीक वर्षाच्या मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ०१०-किमान गरजा कार्यक्रम - पंचवार्षिक योजनातंर्गत योजना-राज्य योजनातंर्गत योजना, (०१)(१०)- ट्रामा केअर युनिटची स्थापना, महाराष्ट्र आपत्कालीन सेवा प्रकल्प (२२१० ४६८९)” करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागप्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१८१३०३३७६११७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Tanbaji Uike

Digitally signed by Ashok Tanbaji Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87cfab3c12a61b33987277f837a341fb6c84ebe6d1bf10339d150649af95e5b8, cn=Ashok Tanbaji Uike
Date: 2017.04.19 15:31:15 +05'30'

**अ.ता.उईके**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (रूग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), पुणे.
४. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा (लेखा व लेखापरिक्षा), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र (लेखा व लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, परभणी.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, परभणी
१०. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती (आरोग्य- ४).

## विवरणपत्र - अ

## ट्रमा केअर युनिट जिंतुर जि.परभणी अस्थाई पदे दिंनाक २८ फेब्रुवारी २०१८ पर्यंत चालु ठेवण्या बाबतचा प्रस्ताव

### उप जिल्हा रुग्णालय /ग्रमिण रुग्णालयाचे नाव :- वैद्यकिय अधिक्षक,ग्रामिण रुग्णालय जिंतुर

| अ.क्र | तात्पुरते पद ज्या शासन निर्णयाद्ववारे निर्माण केले त्याचा शा.नि.क्र. व दि. | पदनाम | पदांची संख्या | वेतनश्रेणी | ज्या शासन निर्णयाद्वारे पदे चालू ठेवण्यात आली त्याचा क्रमांक व दिनांक | ज्या तारखे पासून पदे पुढे चालू ठेवावयाची आहेत तो दिनांक | लेखाशिर्ष | पदे पुढे चालू ठेवण्याबाबत कारणे |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| १ | शा.नि.क सर्वआविक/डिएचसी/३०१०/प्रक्र १८८/आरोग्य-३ दि २.२.११ | वैद्यकिय अधिकारी वर्ग २ | २ | १५६०-३९१०० ग्रे. पे ५४०० | शा.नि.क्रं अपपदे-२०१६/ प्रक्र ३८/आरोग्य-४ दि २०.१०. १६ | ०१/०३/१७ | २२११०१११ वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०७(०२) प्रा.आ केंद्रांचा ग्रारु एतका दर्जा वाढवणे (२२१०१११)जी. आर.न.एपीएडीई २०१३ सीआर २२६/ए/४दि.४.५. १३ | अपघातग्रस्त रुग्णांना अत्यावस्थ रुग्णांना तसेच ग्रामिण भागातील आरोग्य सुविधा देणेसाठी पुढे चालु ठेवणे आवश्यक |
| २ | | अस्थिव्यंग शल्य चिकित्सक | १ | १५६०-३९१०० ग्रे. पे ५४०० | | ०१/०३/१७ | | |
| | | बधिरिकरण तज्ञ | २ | १५६०-३९१०० ग्रे. पे ५४०० | | ०१/०३/१७ | | |
| | | परिसेवीका | १ | ९३००-३४८०० ग्रेड पे ४३०० | | ०१/०३/१७ | | |
| | | अधिपरिचारिका | ३ | ९३००-३४८००ग्रेड पे ४२०० | | ०१/०३/१७ | | |
| ३ | | कक्षसेवक | ३ | ४४४०-७४४० | | ०१/०३/१७ | | |
| | एकुण | | १२ | | | | | |

वैद्यकिय अधिक्षक
ग्रामिण रुग्णालय जिंतुर